**राज्य योजनांतर्गत योजना बिनतारी संदेश यंत्रणेची बळकटीकरण परिरक्षण योजनेअंतर्गत सन २०१४-१५ अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः टिआरएस-०६/२०१४/प्र.क्र.१२२/फ-६**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

तारीख: १२ फेब्रुवारी, २०१५

वाचा -

**१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३०(१४-१५)/३०३, दिनांक २७.५.२०१४**

**२) शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २०.०६.२०१४, दिनांक १५.७.२०१४ व दि.३१.१.२०१५**

**३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थ-३ दिनांक २.१.२०१**

**४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक ९.२.२०१५**

**शासन निर्णय-**

राज्य योजना-बिनतारी संदेश यंत्रणेची उभारणी, बळकटीकरण व परिरक्षण या योजनेचा रु.१००.०० लक्ष एवढया रकमेचा सन २०१४-१५ चा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केला होता. या रक्कमेमधून या यंत्रणेचे परिरक्षण, रॉयल्टी, लायसन्स फी भरणे इत्यादीसाठीचा खर्च भागविण्यात येतो. याकरीता सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षासाठी रु.१००.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक २.१.२०१५ च्या परिपत्रकानुसार अर्थसंकल्पीत रक्कम रु. १००.०० लक्ष रकमेच्या ६०% च्या मर्यादेत म्हणजेच रु.६०.०० लक्ष इतका निधी वितरित व खर्च करण्यास उपरोक्त संदर्भ क्र. २ नुसार मान्यता देण्यात आली आहे.

आता वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक ४ च्या परिपत्रकानुसार एकूण रु.१००.०० लक्षच्या ७५% प्रमाणे रु. ७५.०० लक्ष इतकी रक्कम वितरीत करता येऊ शकते. त्यापैकी संदर्भ क्र.२ नुसार यापूर्वी रु. ६०.०० लक्ष वितरीत करण्यात आलेले आहे. त्यामुळे उर्वरीत रक्कम रु.१५.०० लक्ष इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेवर होणारा खर्च-२४०६, वनीकरण व वन्यजीवन, ०१ वनीकरण १०१ (११) वनसंधारण व विकास, पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना, (११) (२५) नागपूर, अमरावती, चंद्रपूर, ठाणे, धुळे वनवृत्तातील बिनतारी संदेश यंत्रणेचे सबलीकरण व देखभाल ही राज्य योजना अंतर्गत योजना (२४०६ २१२३) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थ-३ दिनांक ९.२.२०१५ च्या परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१२२२४९२०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.02.13 16:17:26 +05'30'

**(डॉ.यु.एम.फारुकी)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक)
५) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
६) महालेखापाल-१२/ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी- अमरावती, गडचिरोली, नागपूर, चंद्रपूर, औरंगाबाद, पुणे, कोल्हापूर, नाशिक, ठाणे, यवतमाळ.
८) कार्यासन अधिकारी, ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई३-२ यांना विनंती करण्यात येते की, नमूद शासन निर्णयानुसार रक्कम वितरित करण्यात यावी.
९) नियोजन विभाग (कार्यासन -१४७५) मंत्रालय, मुंबई- ३२.
१०) वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०/अर्थ-६, मंत्रालय, मुंबई-३२.
११) कार्यासन अधिकारी फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) फ-६, कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.